**ना.मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई आणि नागपूर येथे नवीन आकृतीबंधाप्रमाणे तासिका तत्वावरील शिक्षकांच्या नियुक्तीकरीता कार्यपध्दती निश्चित करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग,ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्रमांक एमएलआय-०५२४/प्र.क्र. ५९/कामगार-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ११ जून २०२४.

**वाचा:** १) शासन निर्णय, उद्योग, उर्जा, कामगार व खनिकर्म विभाग क्र.एमएलआय-०७१७/ प्र.क्र.२०/कामगार-६ दि.१२/०३/२०२४
२) शासन निर्णय उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.१८१/२१/विशि-१ दि.१७/१०/२०२२
३) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्र.एमएलआय-०११९/प्र.क्र.३४/ कामगार-६ दि.०९/०६/२०२३
४) संचालक, ना.मे.लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था यांचे पत्र क्र.मश्रविसं/४७९ दि.२५/०४/२०२४

**<u>प्रस्तावना:</u>**

ना.मे.लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था,मुंबई/नागपूर या दोन्ही ठिकाणी -श्रम विज्ञान◦ विषयाची पदव्युत्तर पदवी (Master of Labour Studies) हा दोन वर्षाचा पूर्णवेळ अभ्यासक्रम अनुक्रमे मुंबई विद्यापीठ आणि राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ यांच्या मान्यतेने शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पर्यंत राबविला जात होता/आहे. नवीन शैक्षणिक धोरण-२०२० (New Education Policy २०२०) नुसार श्रम विज्ञान विषयाची पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमात सुधारणा करण्यात आली असून, सदर अभ्यासक्रमाचे नाव -मानवी भांडवल व्यवस्थापन व कर्मचारी संबंध◦ (Master of Human Capital Management and Employee Relations- MHCM&ER) असे केलेले आहे. सदर अभ्यासक्रम हा शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून मुंबई विद्यापीठ आणि राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ यांच्या मान्यतेने दोन वर्षांत एकूण चार सत्रांमध्ये (Semester) राबविण्यात येत आहे. या दोन्ही संस्था मुंबई व नागपूर विद्यापीठाची संलग्न असून त्या विद्यापीठांची पदव्युत्तर पदवी विद्यार्थ्यांना प्रदान करण्यात येते.

ना.मे.लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्थेच्या दि. १२/०३/२०२४ च्या शासन निर्णयाप्रमाणे विहित केलेल्या नवीन आकृतीबंधात मुंबई व नागपूर येथे प्रत्येकी ८ असे १६ तासिका तत्वावरील शिक्षकांच्या मनुष्यबळ सेवा उपलब्ध करुन घेण्याची मान्यता देण्यात आलेली आहे. शासनातर्फे या संस्थेमार्फत शिकविण्यात येणारा हा विशेषीकृत असा अभ्यासक्रम आहे. त्यामुळे, हा अभ्यासक्रम विशेषत: उद्योग क्षेत्रातील तज्ञांच्या प्रत्यक्ष अनुभव मार्गदर्शनानुसार शिकविण्यात येतो. नव्याने शिकविण्यात येणारा -मानवी भांडवल व्यवस्थापन व कर्मचारी संबंध◦ हा अभ्यासक्रम देखील अनुभवाधिष्ठित स्वरुपाचा असून, त्यानुसार विषयांची रचना केलेली आहे. अशाप्रकारे सैध्दांतिक व प्रत्यक्ष अनुभव तसेच औद्योगिक कार्यपध्दतीनुसार समन्वय साधून सदर अभ्यासक्रम शिकविण्यात येत आहे. यामुळे, या अभ्यासक्रमाचे शिक्षण हे बहुतांशी अभ्यागत प्राध्यापक/अधिव्याख्याते यांच्या मार्फत दिले जात आहे.

शासनाने उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या दि. १७/१०/२०२२ च्या शासन निर्णयांन्वये तासिका तत्वावर अध्यापकांच्या नियुक्तीची कार्यपध्दती निश्चित केली आहे. त्यानुसार सहसंचालक, उच्च शिक्षण

यांच्यामार्फत पूर्णवेळ रिक्त पदाकरीता फक्त दोनच तासिका तत्वावरील अध्यापकांची नेमणूक करणे शक्य आहे. याशिवाय अधिक कार्यभार असल्यास, त्या उर्वरीत कार्यभारासाठी तासिका तत्वावरील अध्यापकांची नेमणूक करणे शक्य आहे. संस्थेमार्फत दि. १७/१०/२०२२ च्या शासन निर्णयातील या कार्यपध्दतीचे पालन होत आहे. संस्थेच्या अभ्यासक्रमातील प्रत्येक विषयासाठी किमान ३ ते ५ अध्यापक लागतात. आकृतीबंधानुसार मुंबई/नागपूर येथे ८ शिक्षकांना तासिका तत्त्वावर करार करुन विषय शिकविणे आवश्यक आहे व अन्य शिक्षक आवश्यकतेनुसार अभ्यागत प्राध्यापक/अधिव्याख्याते राहतील. या बाबी लक्षात घेवून, संस्थेला तासिका तत्त्वावरील शिक्षकांच्या व अभ्यागत प्राध्यापक/अधिव्याख्याते यांच्या कामकाजासंदर्भात कार्यपध्दती निश्चित करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार, आता खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय:-</u>**

ना.मे.लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था मुंबई/नागपूर येथे -मानवी भांडवल व्यवस्थापन व कर्मचारी संबंध॰ या अभ्यासक्रमाची एका वेळी २ सत्रे (Semester) चालू असतात हे लक्षात घेऊन प्रत्येक सत्राकरीता (Semester) ४ याप्रमाणे ८ तासिका तत्त्वावरील शिक्षकांची विषयनिहाय नेमणूक करार पध्दतीने करण्यात यावी.

२. सदर अभ्यासक्रम हा विशेषीकृत अभ्यासक्रम आहे, ही बाब विचारात घेता तासिका तत्त्वावरील शिक्षकांव्यतिरिक्त आवश्यतेनुसार एका विषयासाठी ३ ते ५ अभ्यागत प्राध्यापक/अधिव्याख्याते यांच्याकडून अभ्यासक्रम पूर्ण करुन घेण्यात यावा. यापेक्षा अधिक अभ्यागत अध्यापकांची आवश्यकता भासली तर त्यांच्या सेवा घेण्याचे अधिकार संचालक, ना.मे.लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था यांना देण्यात येत आहे. करार तत्त्वावरील शिक्षक व अभ्यागत प्राध्यापक/अधिव्याख्याते यांची नियुक्ती करतांना त्यांचा शैक्षणिक/औद्योगिक क्षेत्रातील अनुभव व अभ्यासक्रमातील विषयाचे ज्ञान विचारात घेवून नियुक्ती करण्यात यावी.

३. करार तत्त्वावरील शिक्षकांची नियुक्ती ही शैक्षणिक सत्रांपुरती मर्यादित असून ती तात्पुरत्या स्वरुपातील असेल. ही नियुक्ती पूर्णवेळ नियुक्ती समजली जाणार नाही व त्यानुसार कोणताही अधिकार संबंधित शिक्षकाला प्राप्त होणार नाही. तासिका तत्त्वावरील नियुक्ती तसेच अभ्यागत प्राध्यापक यांच्या सेवा या शैक्षणिक सत्रापुरत्या मर्यादित असल्यामुळे, त्यांना आरक्षणाचे नियम लागू होणार नाहीत.

४. शासनाच्या दि.०९/०६/२०२३ रोजीच्या शासन निर्णयाप्रमाणे तासिका तत्त्वावरील शिक्षक, तज्ञ अभ्यागत प्राध्यापक/अधिव्याख्याते यांना मानधन प्रदान करण्यात यावे. या मानधनात शासन ज्याप्रमाणे वाढ करेल त्याप्रमाणे मानधन आदा करण्यात यावे.

५. सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०६१११७४६२९०५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL YASHWANTRAO KAPADNIS

Digitally signed by SWAPNIL YASHWANTRAO KAPADNIS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=3389518a88af500ef17fd52858804c56d5b0db93ce68c9638764849614f0c8b3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=824DB7B32ED13AAC7B6F1F11E717770B52D6784F2BC41DDF0E4E9729CDB96F88, cn=SWAPNIL YASHWANTRAO KAPADNIS
Date: 2024.06.11 17:59:27 +05'30'

**( स्वप्निल कापडणीस )**
**उप सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) ना.मे.लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई
२) उपसंचालक, ना.मे.लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था,नागपूर.

**प्रत**,

१) प्रधान सचिव (कामगार), उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई
२) कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई.
३) कुलसचिव, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर.
४) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
७) निवड नस्ती (कामगार-६).